**कृषि उन्नती योजनेअंतर्गत बियाणे व लागवड साहित्य (एस पी एम) (पुर्वीची एसएमएसपी योजना) या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत ग्रामबिजोत्पादन कार्यक्रमाकरिता सन २०२२-२३ मधील सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी सन २०२३-२४ मध्ये वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२२/प्र.क्र.१५६/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ मे, २०२३.

**संदर्भ :** १. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२२/प्र.क्र.१४६/१-अे, दि.०३.११.२०२२ (प्रशासकीय मान्यता आदेश)

२. केंद्र शासनाचे पत्र क्र. १०-११/२०२०- SD-VI, दि.२२.०३.२०२३

३. महाबीज अकोला यांचे पत्र क्र.महाबीज/विपणन/२०२२-२३/२४९, दि.२७.०३.२०२३

४. कृषि आयुक्तालयाचे पत्र जाक्र.गुनि.१/२/एसपीएम/निधीमागणी/१०९५६,दि.२७/०३/२०२३

५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२२/प्र.क्र.१५६/१-अे, दि.३१.०३.२०२३.

६. कृषि आयुक्तालयाचे पत्र जाक्र.गुनि.१/२/एसपीएम/निधीमागणी/१३०८६/२०२३,दि.१३/०४/२०२३

**प्रस्तावना:**

सन २०२२-२३ या वर्षासाठी कृषि उन्नती योजने अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य (एसपीएम) ग्रामबिजोत्पादन योजनेच्या अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिस्सा रु. ६४८.८० लाख (६०%) व त्यास समरुप राज्य हिस्सा रु. ४३२.५३ लाख (४०%) असा एकूण रु. १०८१.३३ लाख इतका निधी संदर्भ क्र.०५ वरील शासन निर्णयावये वितरीत करण्यात आलेला होता. यापैकी राज्य हिश्श्याचा रु. ४३२.५३ लाख (४०%) निधी वितरीत झालेला असून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) उद्भवलेल्या तांत्रिक अडचणीमुळे केंद्र हिश्श्याचा रु. ६४८.८० लाख निधी वितरीत होऊ शकलेला नाही. सबब, सन २०२२-२३ या वर्षातील सदर निधी सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षी वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र.०६ वरील पत्रान्वये केलेली आहे. सदर निधी २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.

यानुषंगाने कृषि उन्नती योजनेअंतर्गत बियाणे व लागवड उप अभियानाअंतर्गत राज्यात ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०२२-२३ या वर्षातील सर्वसाधारण प्रवर्गाचा २४०१ ३९९५ या लेखाशिर्षाअंतर्गत (केंद्र हिस्सा) रु. ६४८.८० लाख इतका निधी सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

कृषि उन्नती योजनेअंतर्गत बियाणे व लागवड उप अभियानाअंतर्गत राज्यात ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०२२-२३ या वर्षातील सर्वसाधारण प्रवर्गाचा २४०१ ३९९५ या लेखाशिर्षाअंतर्गत (केंद्र हिस्सा) रु. ६४८.८० लाख इतका निधी सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत

आहे. त्यास समरुप २४०१ ए १५४ या लेखाशिर्षाअंतर्गत राज्य हिस्सा रु. ४३२.५३ लाख निधी दि.३१.०३.२०२३ रोजी वितरीत करण्यात आलेला आहे.

२. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च चालू सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**सर्वसाधारण प्रवर्ग :**

**केंद्र हिस्सा लेखाशिर्ष**

मागणी क्रमांक - डी-३
२४०१ पीक संवर्धन,
(००) (२३) कृषि उन्नती योजना- बियाणे व लागवड साहित्य (केंद्र पुरस्कृत योजना)
(केंद्र हिस्सा ६० टक्के)
२४०१ ३९९५ (कार्यक्रम)
३३, अर्थसहाय्य

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरुवातील अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरुपात रकमा विचारात घेता येईल व सदिंग्धता राहणार नाहित.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) सदर योजनेकरीता प्राप्त झालेला निधी हा ज्या संवर्गासाठी मंजूर केलेला आहे त्याच संवर्गासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर योजनेकरीता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांच्या कार्यालयातील सहायक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/ टेंडर नियामावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D. म्यॅनूअलच्या अधिन राहून/C.V.C.तत्वानूसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी

यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन निर्णय/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहिल.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय हा महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच नियोजन विभागाच्या मंजूरीनुसार व वित्त विभागाने अनौ.सं.क्र.१३०/२०२३/व्यय-१,दि.२७.०४.२०२३ नुसार दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०५०४१६२८११८१०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.05.04 16:34:33 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
५) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) अवर सचिव, कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२)अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.